राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ.येलूर,ता. कंधार जि.नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा-२०२०/प्र.क्र.१३/पापु-१८**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २४ एप्रिल,२०२०

**वाचा-**

१) ग्रामपंचायत येलूर ता.कंधार जि. नांदेड ची ग्रामसभा ठराव क्र. २ , दि. ३१/१२/२०१३
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रदान केलेली सुधारीत तांत्रिक मान्यता दि.२५/०२/२०२०.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,नांदेड यांचे पत्र क्र. जा.क्र. जिपनां/पापुवि/३३६७, दि.२६/१२/२०१९

**प्रस्तावना-**

मौ.येलूर,ता. कंधार जि.नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या मुळ अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जि.प.नांदेड यांनी मुळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तथापि,सदर कामाच्या जादा दराच्या निविदा स्विकृत केल्यामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जि.प.नांदेड यांनी संदर्भ क्र.२ अन्वये सुधारीत तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.नांदेड यांनी योजनेच्या सुधारीत आराखड्यास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेस्तव संदर्भ क्र.३ अन्वये सुधारीत प्रस्ताव शासनास सादर केला आहे.तद्अनुषंगाने सदर योजनेच्या सुधारीत आराखड्यास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

मौ.येलूर,ता.कंधार जि.नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.५७.३१ /-लाख (अक्षरी रुपये सत्तावन्न लाख एकतीस हजार फक्त ) एवढ्या सुधारीत किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) उपरोक्त नमुद सुधारीत किंमतीत उर्वरीत कामे ३ महीन्यात पुर्ण करावीत.

२) या योजनेच्या सहमती दिलेल्या मुळ प्रशासकीय मान्यतेच्या व सुधारीत तांत्रिक मान्यता देताना नमुद केलेल्या अटी व शर्तींचे काटेकोर पालन करण्यात यावे.

३) ही योजना पुर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी.संबंधित कार्याकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जि.प.नांदेड यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पुर्ण झाली आहे.या आशयाची सुचना मिळाल्याच्या दिनांकापासुन एक महीन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पुर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियता,जिल्हा परिषद,नांदेड व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळुन आल्यास योजना ताब्यात देण्यापुर्वी ते सुधारण्यात यावेत.

४) ही योजना राबविणे,त्याचे परिरक्षण करणे, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन),या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५) सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद) योजना हस्तांतरण करुन घेणे बंधनकारक राहील.तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखभाल व दुरुस्ती अभावी,वीज देयक न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसुन येते.यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षण राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७) हागणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९) सदरील योजनेचा समावेश गाव कृती आराखड्यात करण्यात यावा.

०२. या योजनेच्या सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च रु.७.३२ /-लक्ष (अक्षरी सात लक्ष बत्तीस हजार) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखालील राज्य हिश्श्यातून/जिल्हा नियोजन मंडळाकडून/किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतुन करण्यात यावा.

०३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग -२ या शासन निर्णयातील भाग पहिला,उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७१८१२१५७२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Gorakh Bharate

Digitally signed by Ravindra Gorakh Bharate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, serialNumber=fd232eb47eb633cb760c7bd2acf421b01b1da040dc965254760018b5f4e33be5, cn=Ravindra Gorakh Bharate
Date: 2020.04.20 02:13:47 -07'00'

**(डॉ.रविंद्र भराटे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव,राजभवन मुंबई.
२. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,नांदेड
४. महालेखापाल,लेखा परिक्षा,महाराष्ट्र-१/२,मुंबई /नागपुर
५. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो),बेलापुर,नवी मुंबई.
६. मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,औरंगाबाद.
७. अधीक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधीकरण,नांदेड
८. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,नांदेड
९. वरिष्ठ भुवैज्ञानिक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नांदेड.
१०.कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,नांदेड.
११.कार्यासने (पापु-०४,१० व २०),पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई.
१२. निवडनस्ती कार्यासन (पापु-१८)